कृषि अधिकारी (जिल्हा परिषद) गट-ब (कनिष्ठ) (राजपत्रित) या संवर्गाच्या राज्य शासनाच्या कृषि विभागातील समावेशनाबाबतची कार्यपद्धती...

# महाराष्ट्र शासन

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्य व्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः कृषिआ- १४१८/प्र.क्र.४१०/१६-अे**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
तारीख: ०९ जानेवारी, २०१९

वाचा- शासन निर्णय , ग्राम विकास विभाग क्र.संकीर्ण-५०१६/प्र.क्र.३९८/आस्था-८, दि.११.१०.२०१८

**प्रस्तावना :-**

जिल्हा परिषदेकडील कृषि अधिकारी हे पद गट-क (तांत्रिक) या संवर्गातील असून या पदाचे नियुक्ती प्राधिकारी संबंधित जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी हे आहेत. ही पदे नामनिर्देशनाने व पदोन्नतीने (विस्तार अधिकारी कृषि या पदावरून पदोन्नतीने) भरण्यात येतात.

राज्य शासनाच्या कृषि विभागाकडील कृषि अधिकारी गट ब (कनिष्ठ) व जिल्हा परिषदेकडील कृषि अधिकारी गट-क (तांत्रिक) या पदाची वेतनश्रेणी, कर्तव्ये व जबाबदाऱ्या समान आहेत. मात्र जिल्हा परिषदेकडील कृषि अधिकारी हे पद अराजपत्रित असून कृषि विभागाकडील सदरचे पद राजपत्रित दर्जाचे आहे. त्यामुळे समानतेच्या तत्वाने जिल्हा परिषदेतील कृषि अधिकारी या पदाला राजपत्रित दर्जा देण्याची मागणी संघटनेकडून करण्यात आलेली होती. या बाबी विचारात घेवून जिल्हा परिषदेकडील कृषि अधिकारी गट-क (तांत्रिक) या संवर्गास राजपत्रित दर्जा देण्यास मा.मंत्रीमंडळाने दि.२५.०९.२०१८ च्या बैठकीमध्ये मान्यता दिलेली आहे. याबाबतचा शासन निर्णय ग्राम विकास विभागाने संदर्भाधीन दि.११.१०.२०१८ अन्वये निर्गमित केलेला आहे. ग्राम विकास विभागाने निर्गमित केलेल्या या शासन निर्णयानुसार कृषि अधिकारी (जिल्हा परिषद) गट-ब (कनिष्ठ) (राजपत्रित) या संवर्गाच्या आस्थापनाविषयक बाबींच्या अनुषंगाने सर्वसमावेशक शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. जिल्हा परिषदेकडील कृषी अधिकारी गट-क (तांत्रिक) या मंजूर पदाचे रूपांतरण करून राज्य शासनाकडील कृषि विभागात "कृषि अधिकारी (जिल्हा परिषद) गट-ब (कनिष्ठ) (राजपत्रित)" या पदनामाचा नवीन संवर्ग निर्माण करुन या संवर्गास राजपत्रित दर्जा देण्यात येत आहे.

२. जिल्हा परिषदेकडील कृषी अधिकारी गट-क (तांत्रिक) हा संवर्ग यापुढे "संपुष्टात आलेली पदे" (मृत संवर्ग) म्हणून घोषित करण्यात आला आहे. त्यामुळे या संवर्गात यापुढे पदभरती केली जाणार नाही.

३. कृषि अधिकारी (जिल्हा परिषद) गट-ब (कनिष्ठ) (राजपत्रित) हे राज्य शासकीय कर्मचारी असतील. त्यांची आस्थापना या विभागाच्या अखत्यारित राहील. या अधिकाऱ्यांच्या सर्व आस्थापनाविषयक बाबी ह्या या विभागाकडून हाताळण्यात येतील. (उदा.सेवा प्रवेश नियम, रिक्त पदांची माहिती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडे सादर करणे, बदल्या, पदोन्नत्या इत्यादी व इतर अनुषांगिक सेवाविषयक सर्व बाबी) या अधिकाऱ्यांची नियुक्ती जिल्हा परिषदेच्या कृषि विभागात करण्यात येईल. तसेच, या अधिकाऱ्यांची बदली जिल्हा परिषदेच्या कृषी विभागाव्यतिरीक्त अन्यत्र होणार नाही.

४. राज्य शासनाकडील महाराष्ट्र कृषि सेवा, गट-ब (कनिष्ठ) व कृषि अधिकारी (जिल्हा परिषद) गट-ब (कनिष्ठ) (राजपत्रित) यांना महाराष्ट्र कृषि सेवा, गट-ब या संवर्गामध्ये कृषि विभागाच्या सध्या प्रचलित असलेल्या नियमानुसार ६:१ या प्रमाणात पदोन्नती देण्यात येईल. (शा.नि., कृषि व सहकार विभाग, एजीई-२१६७/२२८७-ई मंत्रालय, मुंबई, दि.२०.०२.१९७४)

५. सध्या कार्यरत असणाऱ्या जिल्हा परिषदेतील कृषि अधिकाऱ्यांना (तांत्रिक क वर्ग) त्यांच्या मुळ संवर्गात म्हणजेच सहाय्यक गट विकास अधिकारी (गट-ब) म्हणून राहण्यासाठी अथवा नवीन संवर्गामध्ये म्हणजेच कृषि अधिकारी (जिल्हा परिषद) गट-ब (कनिष्ठ) (राजपत्रित) या संवर्गामध्ये त्यांचा समावेश करण्यासाठी विकल्प घेवून त्याप्रमाणे ग्राम विकास विभागाकडून त्यांची पदनिश्चिती करण्यात येईल.

६. कृषि अधिकारी (जिल्हा परिषद) गट-ब (कनिष्ठ) (राजपत्रित) या संवर्गात ६४० मंजूर पदे (सध्याच्या कृषि अधिकारी गट-क (तांत्रिक) संवर्गाची मंजूर असलेली ६४० पदे) असतील. (शा.नि., कृषि व पदुम विभाग दि.०९.०८.२०११ व दि.२६.०९.२०११) या पदांवरील पदभरतीकरिता सरळसेवा व पदोन्नतीचे प्रमाण ५०:५० असे राहील. कृषि अधिकारी (जिल्हा परिषद) गट-ब (कनिष्ठ) (राजपत्रित) या पदावरील पदोन्नतीसाठी जिल्हा परिषदेकडील विस्तार अधिकारी (कृषि) हे सेवाज्येष्ठतेप्रमाणे पात्र राहतील.

७. कृषि अधिकारी (जिल्हा परिषद) गट-ब (कनिष्ठ) (राजपत्रित) या संवर्गाची सेवाज्येष्ठता यादी ही स्वतंत्रपणे ठेवण्यात येईल. ही ज्येष्ठतायादी ग्राम विकास विभागाकडून एकत्रित करून मान्यतेसाठी व प्रसिद्धीसाठी आयुक्त (कृषि) यांचेमार्फत या विभागाकडे पाठविण्यात येईल.

८. कृषि अधिकारी (जिल्हा परिषद) गट-ब (कनिष्ठ) (राजपत्रित) या संवर्गामधील बदलीपात्र अधिकाऱ्यांची यादी, रिक्त पदांचा त्रैमासिक अहवाल, बिंदूनामावली व सेवा विषयक अन्य सर्व बाबींबाबतचे प्रस्ताव संबंधित जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांचेमार्फत आयुक्त (कृषि) यांचेकडे सादर करण्यात येतील.

९. या शासन निर्णयातील तरतुदीनुसार शासन अधिसूचना, कृषि, पशुसंवर्धन, दुगधव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग , दि.१५.०६.२०११ मध्ये आवश्यक ते बदल यथावकाश करण्यात येतील.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१०९१७५०२७७००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sugriv
Sambhaji
Dhapate

Digitally signed by Sugriv Sambhaji Dhapate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d02297f9b5e889636956e39bfae4ea112e908c0e9a7e572d4190f9709a817f51, serialNumber=fc102de27dc1b41e747ac6cbb491c4209459c3cf340720ea98fd1d95b19c9f65, cn=Sugriv Sambhaji Dhapate
Date: 2019.01.10 11:03:28 +05'30'

**( सु.सं. धपाटे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे प्रधान सचिव
२. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.राज्यमंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. सर्व मा.विधानमंडळ सदस्य
६. अप्पर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (ग्राम विकास) यांचे स्वीय सहाय्यक, ग्राम विकास व पंचायतराज विभाग, बांधकाम भवन, मुंबई.
८. सचिव (कृषी) यांचे स्वीय सहाय्यक, कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय मुंबई.
१०.विभागीय आयुक्त (सर्व)
११.आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
१३.संचालक (सर्व), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४.विभागीय कृषी सहसंचालक (सर्व)

१५.जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी (सर्व)

१६.सहसंचालक (आस्थापना), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

१७.जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)

१८. सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

१९. निवडनस्ती (कार्यासन-१६ ए), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.